पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या विविध
कार्यक्रमांचा प्रचार व प्रसिद्धी करण्यासाठी
जाहिरात संस्थांचे पॅनल तयार करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांक : स्वभामि -२०१७/प्र.क्र.६५/पापु-१६

७ वा मजला, गो.ते.रूग्णालय संकुल,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: ३१ मार्च, २०१७

**वाचा -**

१) **पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०१५/प्र.क्र.२०१/पापु-०८, दि.६ एप्रिल, २०१६.**
२) **पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०१५/प्र.क्र.२०१/पापु-०८, दि.३० सप्टेंबर २०१६.**
३) **पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, पत्र क्रमांकः ०११७/प्र.क्र.०२/वासो०३/पापु-२५, दि.२१/०३/२०१७.**

**प्रस्तावना -**

पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्रातील राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांचा, त्याच्या उद्देशांचा जनसामान्यांमध्ये प्रभावरितीने प्रचार व प्रसिद्धी करणे आवश्यक आहे. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडुन राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण), जलस्वराज्य टप्पा-२, संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान इत्यादी विविध लोकाभिमुख कार्यक्रम राबविले जातात. या कार्यक्रमांची प्रचार व प्रसिद्धी करण्यासाठी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागस्तरावर जाहिरात संस्थांचे पॅनल तयार करण्यासाठी वाचा क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये निवड समिती गठीत करण्यात आली होती. सदर निवड समितीने पाणी पुरवठा व स्वच्छता विभागस्तरावर जाहिरात संस्थांच्या पॅनलमध्ये समावेश करण्यासाठी ३४ जाहिरात संस्थाची शिफारस करण्यात आल्याचे वाचा क्र.३ अन्वये संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी कळविले आहे. निवड समितीने शिफारस केलेल्या ३४ जाहिरात संस्थाचे नवीन पॅनल तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्रातील राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांचा, त्याच्या उद्देशांचा जनसामान्यांमध्ये प्रभावरितीने प्रचार व प्रसिद्धी करण्यासाठी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागस्तरावर जाहिरात संस्थांच्या अनुसूचीमध्ये (पॅनलमध्ये) या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट १ मधील ३४

जाहिरात संस्थांचा समावेश करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.या जाहिरात संस्थांचा समावेश खालील अटींच्या अधिन राहुन करण्यात येत आहे.

१) दूरदर्शन, प्रसारभारती, आकाशवाणी, Department of Audio Visual Puplicity व इंडियन न्युजपेपर सोसायटी या शासकीय संस्थांनी दिलेली अधिस्विकृती किंवा त्यांना अन्यथा असलेल्या जाहिरातविषयक कामांचा पूर्वानुभव व कामाची गुणवत्ता विचारात घेऊन वरील जाहिरात संस्थांचा या राज्यस्तरीय अनुसूचिमध्ये (पॅनलमध्ये) अंतर्भाव करण्यात आला आहे. या जाहिरात संस्थांच्या सेवांचा उपयोग पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जिल्हा परिषदा, ग्रामपंचायती, नगरपालिका, महानगरपालिका पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील बाहय अर्थ सहाय्यित प्रकल्प यांनी पाणी पुरवठा व स्वच्छता विषयक व इतर अनुषंगिक कार्यक्रमांच्या प्रचार व प्रसिध्दीच्या कामांसाठी आवश्यकतेनुसार करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२) (I) या जाहिरात संस्थाना स्थानिक स्वराज्य संस्था/ महानगरपालिका इत्यादीकडे संस्था नोंदणी करणे अनिवार्य असेल.

(II) या अनुसूचीमध्ये अंतर्भाव करण्यात आलेल्या जाहिरात संस्थांच्या सेवांचा उपयोग करण्यासाठी पारदर्शक व स्पर्धात्मक पध्दतीचा अवलंब करुन प्रत्येक कामांचे दर निश्चित करण्याची जबाबदारी त्यांचा वापर करु इच्छिणाऱ्या संबंधित यंत्रणेची राहिल. त्यासाठी संबंधित यंत्रणांना प्रथम त्या त्या विशिष्ट कामांच्या तांत्रिक वा आर्थिक निविदा स्वतंत्र लिफाफ्यात प्रत्येक काम देतांना पॅनलवरील किमान ८ पुरवठादारांकडून मागवाव्यात व त्यासाठी किमान ७ दिवसांची वेळ दयावी. कामांची पातळी विचारात घेऊन हा कालावधी कमी करण्याचा अधिकार संबंधित यंत्रणेच्या प्रमुखास राहिल, मात्र यासाठी कारणे नमुद करावीत. प्राप्त झालेल्या तांत्रिक निविदा प्रथम उघडून, करुन घ्यावयाच्या प्रचार प्रसिध्दीच्या कामाचे स्वरुप त्यासाठी आवश्यक गुणवत्ता यांचा विचार करुन अनुक्रमे पहिल्या ३ तांत्रिकदृष्टया सक्षम निविदाकारांचे आर्थिक निविदा लिफाफे उघडावेत. इतर आर्थिक न उघडताच संबंधितांना परत कराव्यात. तांत्रिक निविदा उघडल्यावर परंतु आर्थिक निविदा उघडण्यापूर्वीच आवश्यकतेनूसार तांत्रिक निविदा सादर केलेल्या निविदाधारकांकडून संबंधित विषयावर दृकश्राव्य पध्दतीचे अथवा प्रत्यक्ष मुलाखतीद्वारे कामाची गुणवत्ता मापन व परिणामकारकता यासाठी सादरीकरण घ्यावे व निविदांच्या तांत्रिक क्षमतेची त्या कामांच्या अनुषंगाने अंतिम निश्चिती करावी. अशाप्रकारे कामाच्या स्वरुपानुसार मुल्यांकन करुन सर्व निविदाकारांचा तांत्रिक गुणानुक्रम निश्चित करावा. अशा ३ प्रथम क्रमांकाच्या तांत्रिक निविदा असणाऱ्या निविदाकारांच्या आर्थिक निविदा उघडून खालीलप्रमाणे पध्दतीचा अवलंब करून प्रथम क्रमांकावर येणारी निविदा अंतिम करावी.

(III) गुणानुक्रमे तांत्रिक क्षमतेत ३ पैकी कामांच्या स्वरुपानुसार प्रभावीपणे काम करु शकणाऱ्या निविदाकारांपैकी ज्या निविदाकारांचे तांत्रिक सादरीकरण, प्रत्यक्ष काम करण्याची क्षमता, कलाकार, स्टोरी, थीम, आर्टवर्क, पूर्वानूभव, इत्यादी बाबी विचारात घेऊन सर्वोत्कृष्ट ठरली व प्रथम क्रमांकावर आली, त्या निविदाकारास ६० गुण दयावे. गुण कसे दयावे, याचे सर्वसाधारण मार्गदर्शन परिशिष्ट-२ मध्ये नमुद करण्यात आले आहे.

उर्वरित क्र. २ व ३ वरील निविदाकारांना त्याप्रमाणात तांत्रिक निविदेसाठी ६० कमाल गुण विचारात घेऊन त्यांच्या तपासलेल्या तांत्रिक क्षमतेनुसार त्याप्रमाणात कमी गुण दयावे व त्याचे विश्लेषण दप्तरी करुन ठेवावे. हे तांत्रिक विश्लेषण करतांना कामाची गरज पाहून गुण द्यावे. यासाठी त्या क्षेत्रातील तज्ञांची मदत घ्यावयासही प्रत्यवाय नाही.

(IV) त्यानंतर या ३ संस्थांच्याही आर्थिक निविदा उघडाव्यात. त्यापैकी किमान दराच्या आर्थिक निविदेला ४० गूण दयावे. इतर दोघांना खालील सुत्रांनुसार निश्चित करुन येणारे गुण दयावे.

(अ) किमान निविदाकाराची रक्कम
------------------------ X ४० = दुसऱ्या क्रमांकाच्या निविदाकारास मिळालेले गुण
दुसऱ्या क्रमांकाच्या निविदाकाराची रक्कम

(ब) याप्रमाणे तिसऱ्या निविदाकाराचेही गुण काढावेत.

(V) त्यानंतर (III) व (IV) मध्ये प्रत्येकाला मिळालेल्या गुणांची बेरीज करुन अशा पध्दतीने ज्या निविदाकाराला सर्वात जास्त गुण मिळाले असतील त्या निविदाकारांशी अंतिम वाटाघाटी करुन कामांचे वाटप करावे व त्याच्याशी आवश्यक करारनामा करावा/ त्यांना कार्यादेश द्यावेत. अशाप्रकारे निश्चितीचे सविस्तर उदाहरण परिशिष्ट-३ मध्ये दिले आहे.

**३)** अपवादात्मक तातडीच्या प्रकरणांमध्ये जाहिरातीसंबंधी कोणतेही काम देतांना कामाचे स्वरुप व शिल्लक असलेला अल्प वेळ विचारात घेऊन पॅनलवरील कोणत्याही संस्थेस ते काम नेमुन देण्याचे अधिकार प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना आहेत. अशा प्रकरणांमध्ये वरील अनुक्रमांक २ मध्ये नमुद केलेल्या निविदा प्रक्रियेची आवश्यकता राहणार नाही. यासाठी पुर्वानुभव विचारात घेऊन पॅनलवरील कोणत्याही संस्थेस काम प्रदान करण्याचे अधिकार त्यांना राहतील.

**४)** तसेच, वृत्तपत्रात, दुरदर्शनवर, अन्य खाजगी वाहन्यांवर माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या माध्यमातून प्रसिध्द करावयाच्या प्रचार प्रसिध्दी विषयक जाहिरातींचे दर केंद्र आणि राज्य शासनाने पूर्वीच निश्चित केले असल्यामुळे अशा जाहिराती प्रसारीत करण्याचे काम देण्यासाठी निविदा प्रक्रियेची गरज नाही. अशी कामे , प्रथम परिशिष्ट-१ मध्ये नमुद केलेल्या यादीमधील कोणत्याही अधिस्विकृती प्राप्त जाहिरात संस्थेमार्फत करुन घेण्यात यावी. अधिस्विकृती नसलेल्या इतर संस्थांनी अधिस्विकृती मिळविल्यास त्यानंतर त्यांनाही शासकीय दराने प्रचार प्रसिध्दी विषयक जाहिरातींच्या प्रसिध्दीची कामे देता येतील.

**५)** अधिसूचीमध्ये समाविष्ट असलेल्या संस्थांचा जाहिरात क्षेत्रातील कामांचा अनुभव व व्याप्ती लक्षात घेता सर्वसाधारणपणे पुढिलप्रकारची कामे या संस्थाकडून सोपविता येतील:-

(अ) प्रभावी प्रचार व प्रसिध्दीसाठी संकल्पना निर्मिती करणे (Conceptualization),

(ब) दृक-श्राव्य माध्यमांद्वारे (Audio- Visuals) प्रसिध्दी करणे,

(क) भित्तीपत्रके, पोष्टर्स, पॅम्फलेट्स, बॅर्नस, बॅजेस, छायाचित्रे, माहितीपुस्तिका, माहिती पत्रिकांची संकल्पना, आर्टवर्क व प्रत्यक्ष छपाई.

(ड) दूरचित्रवाणी (TV), रेडिओ व वृत्तपत्रातील सर्वप्रकारच्या जाहिरातींची संकल्पना, विकास,निर्मिती व प्रसारण,

(इ) माहितीपट, लघुपट निर्मिती, चित्ररथाद्वारे (टॅब्लो), प्रचार, यात्रा, आठवडी बाजार,बाजारपेठामध्ये प्रचार सभा-मेळावे घेणे (Event Management) व इतर माध्यम, (उदा. Social Networking sites, you tube, etc.)

(फ) विशिष्ट कार्यक्रमाच्या परिणामकारकतेच मुल्यमापन करण्यासाठी सर्वेक्षण करणे (Impact Assessment)

(ग) या कामांबाबत धोरण ठरविण्यासाठी प्रशासकीय यंत्रणेस सल्ला देणे व शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या निर्देशानुसार जाहिरात क्षेत्रांशी संबंधित अन्य सेवा पुरविणे.

६) जाहिरात संस्थेस जाहिरात विषयक काम देतांना आवश्यकता असल्यास कामांच्या अटी व शर्तीचा समावेश असलेला उभयपक्षी करारनामा करुन त्यानंतरच कार्यादेश निर्गमित करण्यात यावेत अथवा ऑफर लेटरमध्ये अटी व शर्ती नमुद करुन त्या मान्य असल्याचे लेखीपत्र संबंधित जाहिरात संस्थेकडून घ्यावे.

७) कोणत्याही प्रकारचे वर नमुद केलेले प्रचार प्रसिध्दी विषयक काम करण्यापूर्वी त्या कामाच्या खर्चासाठी सर्वसाधारणपणे अग्रीम रक्कम अनुज्ञेय नाही. परंतू, बँक गॅरंटीवर व इतर तत्सम सेक्युरिटीवर २० % पर्यंत अग्रीम देता येईल. तथापि, नेमुन दिलेले काम विहित वेळेत व करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार पुर्ण झाल्याची संबंधित यंत्रणेच्या विभाग प्रमुखांची खात्री झाल्यानंतरच जाहिरातीच्या देयकांचे प्रदान करण्यात येईल.

८) या जाहिरात संस्थांचा पॅनलवरील समावेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून २ वर्षाच्या कालावधीकरिता राहील या २ वर्षाच्या कालावधीतील या संस्थांच्या एकूण कार्यक्षमतेचा व परिणामकारकतेचा आढावा घेऊन संबंधित संस्थेच्या पॅनेलमधील समावेशास पुढील मुदत वाढ देण्याचा अथवा पॅनलवरुन नाव कमी करण्याचे अधिकार शासनाला असतील.

९) उपरोक्त पॅनलवरील जाहिरात संस्थांच्या कामांबाबत पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, जिल्हा परिषदा, पंचायत समित्या, ग्रामपंचायती, नगरपालिका, महानगरपालिका व इतर शासकीय / निमशासकीय संस्था यांच्याकडून तक्रार प्राप्त झाल्यास त्या तक्रारीची योग्य तपासणी करुन सदर जाहिरात संस्थेचे नाव अनुसूचीमधून (पॅनलमधून) कमी करण्याचे तसेच, या पॅनलमध्ये वेळोवेळी इतर जाहिरात संस्थांचा अंर्तभाव करण्याचे व वर नमुद केलेल्या अटीशिवाय जादा अटी समाविष्ट करण्याचे अधिकार शासनास असतील.

१०) सदर शासन निर्णयान्वये पॅनलमधील जाहिरात सस्थेंला काम देताना सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्रमांक-मावज २०१६/प्र.क्र.३९७/३४,दिनांक ५ जानेवारी ,२०१७ मधील तरतुदींचे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१५१२५४६३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RUCHESH JAIVANSHI

Digitally signed by RUCHESH JAIVANSHI
DN: c=IN, o=Personal , CID - 4464799, 2.5.4.20=d667eb527ee31dc5a3a92192805da973bcaa80607ade85fef87112b96f56f1dc, postalCode=442605, st=Maharashtra, serialNumber=c3d94c036d3163a1465a4869ad480a242284a302a34ee37a6dbf1140479c8b94, cn=RUCHESH JAIVANSHI
Date: 2017.03.31 17:00:25 +05'30'

**रुचेश जयवंशी**

उपसचिव तथा प्रकल्प संचालक,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे स्विय सहाय्यक.
४. जिल्हाधिकारी (सर्व).
५. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई.
६. संचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे.
७. आयुक्त,महानगरपालिका (सर्व).
८. महासंचालक,आरोग्य महासंचालनालय,मुंबई.
९. संचालक,नगरपालिका प्रशासन,वरळी,मुंबई.
१०. सदस्य सचिव (तांत्रिक),महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
११. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,बेलापुर,नवी मुंबई.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व).
१३. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,(सर्व)
१४. मुख्याधिकारी,नगरपरिषद (सर्व).
१५. सर्व पर्यवेक्षीय अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
१६. परिशिष्ट १ मधील यादीतील जाहीरात संस्था.
१७. कार्यासन-३४,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१८.कार्यासन-उद्योग ४, उद्योग,उर्जा व कामगार विभागा,मंत्रालय,मुंबई-३२.
१९. सर्व कार्यासने, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.

शासन निर्णय क्र.स्वभमि-२०१७/प्र.क्र.६५/पापु-१६,दिनांक ३१मार्च,२०१७ चे सहपत्र

**परिशिष्ट "१"**

| पॅनलवरील जाहिरात संस्थांची यादी | | |
|---|---|---|
| १ | अॅड फॅक्टर्स नॉलेज - ड्राईवन कम्युनिकेशन | सिटी हॉल, ओयासिस कॉम्प्लेक्स, कमला मिल कंपाऊंड, पांडुरंग बुधकर मार्ग, लोअर परेल, (वेस्ट(, मुंबई ४००० ०१३ |
| २ | अॅडमाईर पब्लिसिटी प्रा. लि. | ६०४,डीएलएच पार्क, एमटीएनएल ऑफिसच्या समोर, एस. व्ही. रोड, गोरेगांव- ४०००६२ |
| ३ | अॅॅगल अॅडव्हर्टायझिंग | शॉप नं-१२, एच विंग, लालबाग राजा सोसायटी, लालबाग,मुंबई-१२ |
| ४ | अॅशुरड अॅडव्हर्टायझिंग अॅड मिडीया प्रा. लि | ३१४, पार्वती इंडस्ट्रियल इस्टेट, सिन मिल कंपाऊंड, लोअर परेल, मुंबई-४०००१३ |
| ५ | अपेक्स अॅडव्हर्टायझिंग | सेसील कोर्ट, १ ला मजला,१९, महाकाली भुषण मार्ग, रिगल सिनेमा पुढे, मुंबई - ४०० ००१ |
| ६ | अॅस्ट्रल अॅडव्हर्टायझिंग अॅन्ड मार्केटिंग प्रा. लि | युनिट नं. १, २ रा मजला, हिंद सर्व्हिस इंडस्ट्रिज, जांभेकर मार्ग, शिवाजी पार्क, दादर (वेस्ट( मुंबई -२८ |
| ७ | आकार अॅडव्हर्टायझिंग अॅन्ड मार्केटिंग प्रा.लि. | ११, मुलजी जेठा बिल्डींग, १८५, प्रिंसेस स्ट्रीट, मरीन लाईन, मुंबई - ४०० ००२ |
| ८ | भास्कर इंडस्ट्रिज | २००/२६२, तळेगांव वाडी, ता. खालापूर, जि. रायगड |
| ९ | सिबिग्स अॅडव्हर्टायझिंग प्रा.लि. | १०४ ए, १ला मजला, ए विंगए इस्टर्न कोर्ट सो, पार्लेश्वर रोड, विले पार्ले (ईस्ट-(४०००५७ |
| १० | कम्युग्रेडस् अॅडव्हर्टायझिंग, प्रा. लि | ५०३, केसरीनाथ अपार्टमेंट, फिल्मीस्थान स्टुडिओ जवळ, एस.व्ही. रोड गोरेगांव वेस्ट, मुंबई-४०००६२ |
| ११ | दत्तात्रय अॅडव्हर्टायझिंग कंपनी | ६७-६८ मराठा हाऊसिंग कॉलनी, वडनेरा रोड, अमरावती - ४४४६०७ |
| १२ | एकविरा उदयोग समूह | ८३, बक्षी कॉम्पेक्स, १३ बी विंग, कोटनाका, उरण, नवी मुंबई-४००७०२ |
| १३ | इलिक्सीर | तळ मजला, रामनिवास बंगलो, प्लॉट नं -२२६-सी, मोरनी अपार्टमेंटच्या बाजूला, सायन (पु) मुंबई २२ |
| १४ | फॉरच्युन क्रिएटिव्ह अॅन्ड मिडिया प्रा. लि. | असगार मंजिल,२११-२१७, नागदेवी स्ट्रेट, १ मजला, ऑफिस नं).७ ए(, मुंबई-४००००३ |
| १५ | फुलराणी अॅडव्हर्टायझिंग अॅन्ड मार्केटिंग | डी-३३, पेंटा गॅलक्सी, एसपीपीएल कॉम्लेक्स, अँटॉप हिल, वडाला (ईस्ट(, मुंबई -४०० ०३७ |
| १६ | गोल्डमाईन अॅडव्हर्टायझिंग | ३०६, दि सुमित, वेस्टर्न एक्सप्रेस हायवे, हनुमान रोड जवळ, विले पार्ले, (ईस्ट(, मुंबई - ४०० ०५७ |

| | | |
|---|---|---|
| १७ | कौटिल्य मल्टिक्रिएशन प्रा. लि. | १०६ सिविक सेंटर, दस्तुरवाडी, नायगांव क्रॉस रोड, दादर -ईस्ट, मुंबई-४०००१४ |
| १८ | मंदार ॲडव्हर्टायझिंग ॲन्ड मार्केटिंग | ८- द्वारिका कॉम्प्लेक्स, महेश नगर, जालना रोड, ऑरंगाबाद- ४३१००१ |
| १९ | मिडीया पार्टनर | ३०२,युनायटेड बिझनेस पार्क, जुन्या पासपोर्ट ऑफिसच्या मागे, रोड नं. ११ वागळे इस्टेट, ठाणे (प) |
| २० | ओम इंटरप्रायझेस | जी-१, गार्डन व्हिव बिल्डींग, आर. एस. पठाणवाला मार्ग, राणीबाग जवळ, मुंबई. -४०००२७ |
| २१ | पद्मश्री प्रोडक्शन प्रा. लि. | रोहन एनक्लेव्ह, सर्व्हे नं. ३९/ए/२, प्लॅट नं. सी. १२, दापोडी, पुणे - ४११०१२ |
| २२ | पॅरामिन ॲडव्हर्टायझिंग ॲन्ड मार्केटिंग असोसिएट्स | ४ ए, बोटावाला चेंबर्स, १ला मजला, पी.एम. रोड, फोर्ट, मुंबई - ४००० ००१ |
| २३ | पायोनेर पब्लिकेशन्स प्रा. लि. | ४१०-४१६, बी. विंग, अंजनी कॉम्पेक्स, पेरिएरा हिल रोड, गुरु नानक पेट्रोल पंप समोर अंधेरी कुर्ला रोड, अंधेरी ईस्ट ४०००९९ |
| २४ | प्रेसमन ॲडव्हर्टायझिंग लि | १२६,जॉली मेकर चेंबर्स II, नरीमन पॉईंट, मुंबई-४०००२१ |
| २५ | पुर्णिमा ॲडव्हर्टायझिंग एजेंसी प्रा. लि. | १८/२ प्रभादेवी इंडस्ट्रियल इस्टेट, सिद्धीविनायक मंदीरच्या समोर प्रभादेवी, मुंबई -४०००२५ |
| २६ | रुतुजा आर्टस् | ६, तेजल अपार्टमेंट, शॉप नं.१३/२, सुखसागर नगर, कात्रज, पुणे-४११०४६ |
| २७ | साई ॲडव्हर्टायझर्स, | मुंबई ८१४, दलामल टॉवर्स, नरिमन पॉईंटस्, मुबई -४०००२१ |
| २८ | संजिवनी ॲडव्हर्टायझिंग कं | ११०९ए, डी.एस. बिझनेस गॅलरिया, एल.बी.एस.रोड, हुमा बिग सिनेमा, कांजुरमार्ग (वेस्ट), मुंबई -४०००७८ |
| २९ | शालिनी पब्लिसिटी ॲन्ड क्रिएटिव्ह प्रा. लि. | ४०१-४०२, ट्रेड स्क्वेअर, ए विंग, ४ था माळा, मेहरा कंपाऊंड,साकीनाका सर्कल जवळ,अंधेरी (पु) |
| ३० | स्क्वेअर कम्युनिकेशन प्रा. लि | ६१०, लक्ष्मी प्लाझा, लक्ष्मी इंडस्ट्रियल इस्टेट, लिंक रोड, अंधेरी (वेस्ट), मुंबई- ५३ |
| ३१ | स्टारलाईन ॲडव्हर्टायझिंग | वाय -३ आरएच-४,सेक्टर-९, सीबीडी, नवी मुंबई |
| ३२ | व्हेंचर्स ॲडव्हर्टायझिंग प्रा. लि | १४२/ए व्हेंचर्स हाऊस मरोळ को ऑप इंडस्ट्रियल इस्टेट मरोळ, अंधेरी (पूर्व), मुंबई ४०००५९ |
| ३३ | व्हिजन ग्राफिक्स | शिव स्मृती अपार्टमेंट, शनिवार पेठ, पुणे. |
| ३४ | व्रित्ती सोल्युशन्स लि. | ९/१० कोंटिनेंटन पार्क, कर्वे स्टॅच्यु समोर, कर्वे रोड, पुणे - ४११०३८ |

(शासन निर्णय क्र. स्वभामि-२०१७/प्र.क्र.६५/पापु-१६, दिनांक-३१मार्च,२०१७ चे सहपत्र)

**परिशिष्ट "२"**

तांत्रिक मुल्यांकनासाठी मार्गदर्शक तत्वे

| अक्र. | मुद्दा | कमाल गुण | प्राप्त गुण |
|---|---|---|---|
| १. | कामाचे स्वरुप पाहता प्रचार प्रसिध्दीच्या माध्यमातून जनमानसापर्यंत जे संदेश द्यावयाचे आहेत, माहिती पोहोचवयाची आहे, क्षमताबांधणी (Capacity Building) अपेक्षित आहे, ते पूर्णपणे संकल्पनेत, आर्टवर्कमध्ये प्रभाविरित्या मांडले गेले काय, याची तपासणी करुन द्यावयाचे गुण | २० | |
| २. | संकल्पनेची, मांडणीची, आर्टवर्कमधील<br>(अ) कल्पकता --- ५ गुण<br>(ब) नाविन्यपूर्णता --- ५ गुण<br>(क) योजकता --- ५ गुण<br>(ड) आकर्षकता --- ५ गुण | २० | |
| ३. | पूर्वीच्या या स्वरुपाच्या केलेल्या इतर कामात झालेली जनमानसातील वाहवा, मिळालेली प्राविण्ये, बक्षिसे वा अन्यथा मिळालेली प्रसिध्दी | ५ | |
| ४. | संस्थेची एकूण आर्थिक व तांत्रिक क्षमता | ५ | |
| ५. | तंत्रज्ञ, कलाकार यांच्या संघाची गुणवत्ता, पुर्वानुभव, जनमानसातील त्यांची ओळख त्यामुळे प्रचार प्रसिध्दीला मिळू शकणारी मदत यांचे विश्लेषण करुन द्यावयाचे गुण. | १० | |
| | एकूण गुण | ६० | |

(शासन निर्णय क्र. स्वभामि-२०१७/प्र.क्र.६५/पापु-१६, दिनांक-३१ मार्च,२०१७ चे सहपत्र)

**परिशिष्ट "३"**

तांत्रिक व आर्थिक निविदांना गुणवितरण करण्यासाठी उदाहरण-

१) समजा अ, ब, क, ड, ई, फ या सहा निविदाकारांच्या तांत्रिक व अर्थिक निविदा प्राप्त झाल्या.

२) यापैकी समजा तांत्रिक मुल्यांकनात गुणानुक्रम खालीलप्रमाणे ठरले.

ब - १
ड - २
अ - ३
इ - ४
फ - ५
क - ६

३) प्रथम क्र.१,२,३ गुणानुक्रमे निवडुन त्यांचेकडुन सविस्तर सादरीकरण घ्यावे व ३ गुणानुक्रमे निश्चित करुन क्र.१ ला ६० गुण धरुन इतरांना त्याप्रमाणात कमी गुण द्यावेत. समजा ते खालीलप्रमाणे मिळालेत.

(i) ब - १ - ६० गुण
(ii) ड - २ - ५० गुण
(iii) अ - ३ - ४५ गुण

४) त्यानंतर वरील तीन निविदाकारांचे आर्थिक प्रस्ताव उघडावे, समजा ते खालीलप्रमाणे आहेत.

ब - रु. ५ लाख
ड - रु. ४ लाख
अ - रु. ४.५ लाख

या संस्थापैकी सर्वात कमी आर्थिक निविदा असलेल्या ड निविदाकारास ४० गुण द्यावेत. इतर दोघांना खालीलप्रमाणे गुण द्यावेत.

ब - ड ची निविदा रक्कम
------------------- x ४० = ४/५x ४० = ३२ गुण
ब ची निविदा रक्कम

अ - ड ची निविदा रक्कम
-------------------- x ४० = ४/४.५ x ४० = ३५.६ गुण
अ ची निविदा रक्कम

४) अंतिम मुल्यांकन खालीलप्रमाणे ठरेल.

| निविदाकार- | तांत्रिक गुण - | आर्थिक गुण - | एकूण - | अंतिम गुणानुक्रम |
|---|---|---|---|---|
| अ - | ४५ - | ३५.६ - | ८०.६ - | ३ |
| ब - | ६० - | ३२.० - | ९२.० - | १ |
| ड - | ५० - | ४०.० - | ९०.० - | २ |

ब ची रु ५ लाखाची निविदा मान्य होईल. त्या निविदाकाराशी वाटाघाटी करुन निविदा अंतीम करता येईल किंवा नाकारता येईल. मात्र नाकारल्यास पुन्हा नव्यानेच वरीलप्रमाणे संपुर्ण प्रक्रिया (किमान ८ संस्थांकडुन पुन्हा तांत्रिक व आर्थिक प्रस्ताव मागविण्यापासुन) करावी लागेल.

-----------